प्रादेशिक पर्यटन विकास योजना सन २०२२-२३ अंतर्गत राज्यातील विविध पर्यटनस्थळांच्या ठिकाणी / गड किल्ल्यांच्या पायथ्यालगत पोर्टेबल टॉयलेटस् उभारण्याच्या कामांना मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टिडीसी २०२३/०३/प्र.क्र.५३/पर्यटन,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : १४ मार्च, २०२३.

**संदर्भ :-** १. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४.०४.२०२२.
२. शासन निर्णय क्रमांक टिडीएस २०२२/०९/प्र.क्र.५४४/पर्यटन, दिनांक : १५ नोव्हेंबर, २०२२.
३. पर्यटन संचालनालयाचे पत्र क्र. पसं/विकास/प्रशासकीय मान्यता/४/ प्र.क्र.५४०/२०२२/७८६, दिनांक २३.०१.२०२३.

**शासन निर्णय :**

राज्यातील विविध गड किल्ल्यांच्या ठिकाणी पर्यटक मोठ्या संख्येने ट्रेकिंग / पर्यटनासाठी जातात. खालील तक्त्यामध्ये नमूद केलेल्या राज्यातील विविध पर्यटनस्थळांच्या ठिकाणी / गड किल्ल्यांच्या पायथ्यालगत एकूण २० पोर्टेबल टॉयलेटस् उभारण्यासाठी प्रादेशिक पर्यटन विकास योजना सन २०२२-२३ अंतर्गत रुपये २००.०० (अक्षरी रुपये दोनशे लक्ष फक्त) च्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देऊन सदर निधी संचालक, पर्यटन संचालनालय, मुंबई यांना वितरित करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे :-

(रुपये लक्षात)

| अ.क्र. | विभागाचे नाव | गड / किल्ल्याचे नाव | पोर्टेबल टॉयलेटची संख्या | अंदाजित रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | कोकण | घानगड, जि. रायगड | १ | २००.०० |
| २ | | रामेश्वर मंदिर परिसर चौल, जि. रायगड | १ | |
| ३ | | चवदार तळे, महाड, जि. रायगड | १ | |
| ४ | | मुरुड जंजिरा बीच, ता. मुरुड, जि. रायगड | १ | |
| ५ | | नांदगाव बीच, ता. मुरुड, जि. रायगड | १ | |
| ६ | | काशिद बीच, ता. मुरुड, जि. रायगड | १ | |
| ७ | नाशिक विभाग | कोतूलेश्वर देवस्थान कोतूळ, ता. अकोले, जि. अहमदनगर | १ | |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ८ | | नांदूर मध्यमेश्वर अभयारण्य, नाशिक | १ | |
| ९ | | भुईकोट किल्ला, जि. अहमदनगर | १ | |
| १० | | कोरेश्वर मंदिर, कोरेगांव, ता. कर्जत, जि. अहमदनगर | १ | |
| ११ | | पांजरे बेट, जि. अहमदनगर | १ | |
| १२ | | संत मुक्ताबाई मुक्ताईनगर, जि. जळगाव | १ | |
| १३ | पुणे विभाग | कोकण दिवा घोळ, गारजाईवाडी, जि. पुणे | १ | |
| १४ | | देहू मंदिर परिसर, देहू जि. पुणे | १ | |
| १५ | | रोहिडेश्वर, बाजार वाडी, ता.भोर, जि. पुणे | १ | |
| १६ | | तोरण मौजे मेट पिलावरे, जि. पुणे | १ | |
| १७ | | पारगड, मौजे मिरवेल, जि. कोल्हापूर | १ | |
| १८ | | रामतीर्थ देवस्थान, आजरा, जि. कोल्हापूर | १ | |
| १९ | | भीमा तीर, मौजे देगांव, ता. पंढरपूर, जि. सोलापूर | १ | |
| २० | नागपूर विभाग | डोंगरतळ किल्ला रामटेक, जि. नागपूर | १ | |
| | | **एकूण** | **२०** | **२००.००** |

२. सदर पोर्टेबल टॉयलेटस् उभारण्यासाठी आवश्यक असलेली जागा व पाण्याची सोय उपलब्ध झाल्यानंतरच व सुरुवातीच्या ३ वर्षापर्यंत देखभाल दुरुस्ती व परिचालन करण्याचे संबंधित ग्राम पंचायतीकडून / विभागाकडून / यंत्रणेकडून हमीपत्र प्राप्त झाल्यानंतरच पोर्टेबल टॉयलेटस् उभारण्याच्या निविदा मागविण्यात याव्यात.

३. सदर पोर्टेबल टॉयलेटस् उभारल्यानंतर एक वर्षानंतरच्या कालावधीतील त्यांच्या कायमस्वरुपी देखभाल -दुरुस्ती व परिचालनासाठी Design, Build, Operate, Maintain and Transfer या प्रकारचे स्वतंत्र मॉडेल तयार करण्यासाठी निविदा मागविण्यात याव्यात. सदर कार्यवाही पोर्टेबल टॉयलेटस् उभारल्यानंतर एक वर्षाच्या आत पुर्ण करण्याची दक्षता घेण्यात यावी, जेणेकरुन ३ वर्षाच्या कालावधीनंतर सदर प्रसाधनगृहे सुव्यवस्थितपणे वापरात राहतील.

४. सदर पोर्टेबल टॉयलेटस्च्या ठिकाणी पिण्याच्या पाण्याची सुविधा उपलब्ध करुन देण्याची दक्षता घेण्यात यावी.

५. <u>अटी व शर्ती</u> :-

१) उपरोक्त कामे दर्जेदार स्वरुपाची व्हावीत, याकरीता स्थापत्य विशारदांची (Theme Based Architect) नेमणूक करुन प्रत्यक्ष कामे नामांकित कंत्राटदारांच्या माध्यमातून करण्यात यावीत व त्या कामांचे योग्य संनियंत्रण आणि गुणनियंत्रण करण्यात यावे.

२) वितरीत केलेल्या निधीतून खर्च करताना वित्तीय नियमांचे आणि विविध नियमांतर्गत नेमून दिलेल्या कार्यपध्दतीचे पालन करण्यात यावे.

३) प्रादेशिक पर्यटन विकास योजनेच्या शासन निर्णय, दि. ४ नोव्हेंबर, २०१० मधील अटी व शर्तीचे उल्लंघन झाल्याचे भविष्यात निदर्शनास आल्यास देण्यात आलेला संपूर्ण निधी व्याजासह वसूल करण्यात येईल.

४) कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. मंजूर अनुदानापेक्षा जादा खर्च झाल्यास त्याची जबाबदारी संचालक, पर्यटन संचालनालय, मुंबई यांची राहील व जादा खर्च प्रित्यर्थ जादा अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

५) मंजूर तरतुदीतून करावयाचा खर्च दिनांक ३१ मार्च, २०२३ पर्यंत करण्यात यावा व मंजूर कामे तात्काळ पूर्ण करावीत.

६) कामाच्या ठिकाणी सदर काम प्रादेशिक पर्यटन विकास योजनेतून करण्यात आल्याचे फलक लावण्यात यावेत.

७) ज्या संदर्भात निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे त्या प्रत्येक योजनेच्या संदर्भात वित्तीय अधिकाराच्या प्रत्यावर्तनानुसार सक्षम प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेणे आवश्यक आहे.

८) अशा प्रत्येक योजनेबाबत करावयाच्या बांधकामासंदर्भात अथवा खरेदीबाबत किंवा सेवा पुरवठा कराराबाबत वित्तीय नियमांप्रमाणे आवश्यक ती कार्यपध्दती पाळणे आवश्यक आहे. या संदर्भात शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-१००२/ प्र.क्र.१५/ कोषा-प्र ५, दि. ६ फेब्रुवारी, २००२ च्या सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल याची खबरदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने घ्यावी. तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्र.बीजीटी-१०.००/प्र.क्र.५६/२०००/वित्तीय सुधारणा, दिनांक १०.९.२००१ मधील उपाययोजनांची अंमलबजावणी तंतोतंतपणे करण्यात यावी.

९) तांत्रिक मान्यता विहित स्तरावर घेण्यात यावी.

१०) योजनेत्तर स्वरुपाच्या कामासाठी (देखभाल/दुरुस्ती इ.) सदरची तरतूद उपयोगात आणली जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

११) सदर निधीतून होणाऱ्या खर्चातून करावयाच्या कामांची भौतिक प्रगती तसेच निधीतून होणा-या खर्चाची मासिक विवरणपत्रे दर महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास न चुकता सादर करावीत.

१२) संचालक, पर्यटन संचालनालय, मुंबई यांनी काम कोणत्याही अन्य योजनेतून / निधीतून पुर्ण करण्यात आले नाही याची खात्री करुनच निधीचे वितरण करावे. मंजूर असलेले काम कोणत्याही अन्य योजनेतून / निधीतून पुर्ण करण्यात आले असल्यास संबंधित कामास वितरित केलेला निधी शासनास परत करण्यात यावा व झालेल्या अनियमिततेबद्दल संबंधितांवर उचित कारवाई करण्यात यावी.

१३) उर्वरित निधीची मागणी करताना उपयोगिता प्रमाणपत्र व कामाची गुणनियंत्रण यंत्रणेद्वारे प्रत्यक्ष तपासणी करुन कामाच्या गुणवत्तेबाबत व कामाच्या सद्यस्थितीबाबतचा प्रमाणित अहवाल (छायाचित्रांसह) शासनास सादर करण्यात यावा

१४) सदर काम पूर्ण झाल्यानंतर सदर कामाच्या देखभालीची तसेच इतर अनुषंगिक कामांची जबाबदारी कार्यान्वयीन यंत्रणा व संबंधित संस्था यांची राहील.

१५) काम पूर्ण झाल्यानंतर सदर पर्यटक सुविधा तात्काळ उपयोगात आणण्याच्या दृष्टीने काम सुरु असतानाच पूर्व नियोजन करावे.

३. वर नमूद करण्यात आलेला खर्च हा सन २०२२-२३ या वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून मुख्यलेखाशीर्ष **"मागणी क्रमांक झेडडी-४, ३४५२-पर्यटन, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१ पर्यटन केंद्रे (०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना, (०२) (१८) पर्यटन विकासासाठी विविध ठिकाणांसाठी मूलभूत सुविधांकरीता अनुदाने (३४५२ १९५८) ३१ सहायक अनुदाने"** या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा. या प्रकरणी मंजूर करण्यात आलेल्या (प्रादेशिक पर्यटन विकास योजनेंतर्गत) सहायक अनुदानाची रक्कम आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्याकरीता मुख्य लेखा अधिकारी, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांना -आहरण व संवितरण अधिकारी◦ व सह संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना -नियंत्रण अधिकारी◦ म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्कम त्यांनी अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई येथे देयके सादर करुन संबंधितांना वितरीत करावी. सदर कार्यवाहीबाबतचा अनुपालन अहवाल शासनास एक महिन्यात सादर करण्यात यावा.

४. प्रमाणित करण्यात येते की, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/ प्र.क्र.४३/ अर्थ-३, दि.०४.०४.२०२२ अन्वये देण्यात आलेल्या सूचनेनुसार व अधिकाराच्या मर्यादेत सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत असून सदर शासन निर्णयाच्या परिशिष्टामधील तपासणीसूची बाबींची व अटींची पूर्तता करण्यात आली आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३१४१४४९२०९१२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

UJJWALA SANTOSH DANDEKAR

Digitally signed by UJJWALA SANTOSH DANDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=c63ad337cb443baf4ff2dd616156bccf1f2629f47cc9704e8e8523f35b0e6505, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BB0449B3A46260C9CACDAD789E301DD18ABAA6D766D244021239745A6F561B29, cn=UJJWALA SANTOSH DANDEKAR
Date: 2023.03.16 17:24:00 +05'30'

**( उज्ज्वला सं. दांडेकर )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई

२. महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर

३. महालेखापाल, (स्थानिक निकाय लेखापरीक्षा व लेखा), मुंबई.
४. प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक विभाग,मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (पर्यटन), पर्यटन व सांस्कृतिक विभाग,मंत्रालय, मुंबई.
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
७. संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई.
९. सह संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०. मुख्य लेखा अधिकारी, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. वित्त विभाग (का.व्यय-१५/ अर्थसंकल्प) मंत्रालय, मुंबई.
१२. अवर सचिव, (अर्थसंकल्प शाखा) पर्यटन व सांस्कृतिक विभाग,मंत्रालय, मुंबई. (यांना आदेशात नमूद करण्यात आलेल्या नियंत्रक अधिकारी, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्याकडे निधी वितरीत करण्याच्या विनंतीसह)
१३. निवड नस्ती, कार्यासन पर्यटन.

***